**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, पांढुर्णा, ता. आष्टी, जि. वर्धा येथील मुलींचे वसतीगृह इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाआबां-२०१४/प्र. क्र. ९० /का.१३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २० ऑगस्ट, २०१४.

**वाचा:-**

१) शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्र. शाआबां-२०१०/प्र.क्र.४९३/का-१३, दिनांक ०१-११-२०१०.

२) आयुक्त,आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र. शाआबां-२०१३/प्र.क्र.४४/का.८(२), दि. ०६.०११.२०१३.

**प्रस्तावना :-**

एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा पांढुर्णा, ता. आष्टी, जि. वर्धा या आश्रमशाळेतील मुलींचे वसतीगृह इमारत बांधकामाला शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. शाआबां-२०१०/प्र.क्र. ४९३/का-१३, दिनांक ०१-११-२०१० अन्वये रु.३.४३ कोटी इतक्या खर्चाला प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सदर वसतीगृहासाठी नव्याने निश्चित करण्यात आलेली जागा खोलगट भागात तसेच नाल्याला लागून असल्यामुळे सदर भाग समतोल करावा लागला आहे. त्यामुळे अंदाजपत्रकात वाढ झालेली आहे. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी वरील संदर्भ क्र. २ मधील नमूद दि.०६.११.२०१३ च्या पत्रान्वये सदर मुलींच्या वसतीगृहाच्या इमारत बांधकामाबाबतचे रु.१,१०,५२,२५१/- रकमेचे अंदाजपत्रक सुधारीत प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०१०-११ च्या दरसुचीवर आधारीत आहे.

२. उपरोक्त प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने अंदाजपत्रक तांत्रिक मान्यतेसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे पाठविण्यात आले होते. सदर अंदाजपत्रकात आवश्यक त्या सुधारणा/दुरुस्त्या केल्यानंतर सार्वजनिक बांधकाम विभागाने खर्चाच्या अंदाजास सहमती दिलेली आहे. त्यानुसार अंदाजपत्रकाला सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर यांचे अंतर्गत शासकीय आश्रमशाळा पांढुर्णा, ता. आष्टी, जि. वर्धा येथील इमारत बांधकामाच्या सुधारीत अंदाजपत्रकास

सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी दिलेल्या सहमतीस अनुसरुन रक्कम रु.४,५३,७५,२५१/-) (रुपये चार कोटी त्रेपन्न लाख पंचाहत्तर हजार दोनशे एकावन्न फक्त) इतक्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु-मोटो रिट याचिका क्र. १४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार सदर काम सुरु होण्यापूर्वी व पूर्ण् झाल्यानंतर त्याचे व्हिडीओ शुटींग करुन त्याची सी.डी. शासनास सादर करावी. प्रस्तावित इमारतीचे बांधकाम किती मुदतीत पुर्ण करण्यात येणार आहे याबाबतचे लेखी पत्र संबंधित कंत्राटदार / ठेकेदार यांचेकडून प्राप्त करुन घेऊन ते शासनास तात्काळ सादर करावे, तसेच प्रत्यक्ष बांधकामाचे वेळी व बांधकाम पुर्ण झाल्यावर कामाची व मालाची गुणवत्ता तपासून संबंधितांचे प्रमाणपत्र घेऊन त्याची एक प्रत शासनास सादर करावी.

३. बांधकामाच्या कामाचा दर्जा तसेच बांधकामास होणारा विलंब यांवर देखरेख करण्याची जबाबदारी संबंधित आदिवासी विकास निरिक्षक, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर यांची राहील.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१मधील सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १५१/ इ.मा.- २, अन्वये दि.०४/०८/२०१४ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४०८२११२३९१६४५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

६. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Navnath Ravaji Wath

Digitally signed by Navnath Ravaji Wath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Navnath Ravaji Wath
Date: 2014.08.21 12:36:22 +05'30'

(नवनाथ वाठ)
कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग.

**प्रत,**

१) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर.
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.

४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, आर्वी,जि.धुळे
५) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर.
६) महालेखापाल (लेखा परिक्षा ), / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मंबई .
७) महालेखापाल (लेखा परिक्षा ), / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
९) आदिवासी विकास निरिक्षक, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर.
१०) कक्ष अधिकारी (इमारती-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११) कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२) निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

------------------------